**मच्छिमार सहकारी संस्थांच्या सभासदांच्या यांत्रिकी नौकांना लागणाऱ्या हायस्पीड डिझेल तेलावरील विक्रीकराची प्रतिपूर्ती करणे या योजनेअंतर्गत सन २०१४-१५ या वर्षात निधी वितरीत करणेबाबत...**

**महाराष्ट्र शासन**

**कृषी, पशुसंवर्धन, दुग्धव्यवसाय विकास व मत्स्यव्यवसाय विभाग**

**शासन निर्णय क्रमांकः मत्स्यवि-१११४/प्र.क्र.१८९/पदुम-१४**

मंत्रालय विस्तार, मुंबई -४०० ०३२

तारीख: ११ सप्टेंबर, २०१४

वाचा -

1. **शासन निर्णय क्रमांकः मत्स्यवि-१००५/प्र.क्र.१७४/पदुम-१४, दि. ३ सप्टेंबर, २००५**
2. **शासन परिपत्रक क्रमांकः मत्स्यवि-२०१२/प्र.क्र.२६६/पदुम-१४,दि.२८ ऑगस्ट, २०१३**
3. **शासन निर्णय क्रमांक:मत्स्यवि-१११४/प्र.क्र.११८/पदुम-१४, दिनांक २२ मे, २०१४**
4. **आयुक्त, मत्स्यव्यवसाय यांचे पत्र क्र.मत्स्य/०५११३०/११९/२०१३, दि. ८.८.२०१४**

**प्रस्तावना -**

मच्छिमार सहकारी संस्थांच्या सभासदांच्या यांत्रिक नौकांना (१-६ सिलिंडर) लागणाऱ्या हायस्पीड डिझेलवर विक्रीकरात सवलत देण्याची योजना राज्यात सन १९७५ पासून राबविण्यात येत आहे. महाराष्ट्र राज्यात दिनांक १ एप्रिल, २००५ पासून मुल्यवर्धीत करप्रणाली अस्तित्वात आल्यामुळे शासन निर्णय दिनांक ३ सप्टेंबर, २००५ पासून सदर योजना सुधारीत स्वरुपात लागू करण्यात आली आहे. या योजनांतर्गत सन २०१४-१५ या वर्षात प्राप्त प्रस्तावांना निधी वितरीत करण्याची बाब शासनाच्या विचाराधीन होती.

**शासन निर्णय-**

मच्छिमार सहकारी संस्थांच्या सभासदांच्या यांत्रिकी नौकांना लागणाऱ्या हायस्पीड डिझेल तेलावरील विक्रीकराची प्रतिपूर्ती करणे या योजनेअंतर्गत रु.१६,००,००,०००/- लाख (रुपये सोळा कोटी मात्र) इतकी रक्कम अर्थसंकल्प वितरण प्रणालीवर वितरीत करण्यास शासन मान्यता देण्यात येत आहे.

२. यासाठी संबंधित जिल्हयाचे सहाय्यक आयुक्त, मत्स्यव्यवसाय ( तांत्रिक) यांना आंहरण व संवितरण अधिकारी म्हणून घोषित करण्यात येत आहे. त्यांनी सदरहू खर्च चालू वित्तीय वर्षात मंजूर करण्यात आलेल्या तरतूदीच्या मर्यादेत खर्च होईल याची दक्षता घ्यावी.

३. यावरील खर्च " मागणी क्रमांक-डी-६, २४०५-मत्स्यव्यवसाय, (००) (१०३) सागरी मत्स्यव्यवसाय, (०१)योजनेत्तर अनुदाने, (०१)(०३) हायस्पीड डिझेल तेलावरील विक्रीकराची प्रतिपूर्ती (राज्य) (२४०५ १२७८), ३३-अर्थसहाय्य " या लेखाशिर्षातंर्गत सन २०१४-१५ साठीच्या उपलब्ध तरतूदीतून भागविण्यात यावा.

४. याबाबत संबंधित जिल्हयांचे सहाय्यक आयुक्त, मत्स्यव्यवसाय (तांत्रिक) हे आहरण व संवितरण अधिकारी राहतील. तसेच आयुक्त, मत्स्यव्यवसाय हे नियंत्रक अधिकारी राहतील. त्यांनी सदर निधी वितरीत करतांना योजनेच्या अटी व शर्तीचे पालन होत असल्याची खात्री करावी.

५. सदर शासन निर्णय नियोजन व वित्त विभागाच्या सहमतीने आणि वित्त विभागाच्या अनौपचारिक संदर्भ क्रमांक ४२१/१४/व्यय-२, दिनांक ५.९.२०१४ अन्वये निर्गमित करण्यात येत आहे.

६. सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेताक २०१४०९१११७०५१९५२०१ असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने.

Sathe Shashank M

Digitally signed by Sathe Shashank M
DN: c=IN, o=Government of Maharashtra, ou=Agri & ADF, postalCode=400032, st=Maharashtra, cn=Sathe Shashank M
Date: 2014.09.11 17:02:23 +05'30'

**( श.मा.साठे )**

उप सचिव, महाराष्ट्र शासन

प्रत,

१. आयुक्त, मत्स्यव्यवसाय, महाराष्ट्र राज्य, मुंबई
२. सह आयुक्त (सागरी), आयुक्त, मत्स्यव्यवसाय याचे कार्यालय, मुंबई
३. प्रादेशिक उपआयुक्त, मुंबई विभाग, मुंबई

४. सहायक आयुक्त, मत्स्यव्यवसाय, मुंबई शहर/मुंबई उपनगर/ठाणे/ रायगड/ रत्नागिरी/ सिंधुदूर्ग
५. महालेखापाल-१, महाराष्ट्र राज्य (लेखा परीक्षा/ लेखा अनुज्ञेयता) मुंबई
६. अधिदान व लेखा अधिकारी, मुंबई
७. निवासी लेखाधिकारी, मुंबई
८. जिल्हा कोषागार अधिकारी, मुंबई शहर/मुंबई उपनगर/ठाणे/ रायगड/ रत्नागिरी/ सिंधुदूर्ग
९. उप कोषागार अधिकारी, मुंबई शहर/मुंबई उपनगर/ठाणे/ रायगड/ रत्नागिरी/ सिंधुदूर्ग
१०.वित्त विभाग (व्यय-२/अर्थसंकल्प), मंत्रालय, मुंबई
११. कार्यासन पदुम-१६, कृषि व पदुम विभाग, मंत्रालय, मुंबई
१२.निवड नस्ती, पदुम-१४

प्रत माहितीकरिता
सचिव (पदुम) यांचे स्वीय सहाय्यक